**भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील उपसंचालक (गट-अ) अधिकाऱ्यांच्या बदल्यांबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन आदेश क्रमांकः आपना २०१४/प्र.क्र.८९/पापु-१५

७ वा मजला, गो.ते.रूग्णालय
मंत्रालय, मुंबई ४००००१
तारीख: ३१ जुलै, २०१४

**शासन आदेश :-**

शासकीय कर्मचाऱ्यांचे बदल्यांचे विनिमयन करण्यासाठी आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ नुसार खाली नमूद केलेल्या भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील उपसंचालक (गट-अ) पदावरील पुढील अधिका-यांच्या प्रशासकीय कारणास्तव बदल्या करण्यात येत असून (स्तंभ-४) मध्ये त्याच्या नावासमोर दर्शविलेल्या कार्यालयात त्यांची पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्याचे कार्यालय | बदलीनंतरचे कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. के. सी. वानखेडे | उपसंचालक, नाशिक | संचालनालय, पुणे. |
| २ | श्रीमती ए. एम. भोकरे | उपसंचालक, पुणे | उपसंचालक, नाशिक येथे श्री. के. सी. वानखेडे यांच्या बदलीने रिक्त होणा-या पदी. |

२. सदर आदेश महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४(४) (दोन) नुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

३. हे आदेश, तात्काळ अंमलात येत असून, वर नमूद केलेल्या अधिका-यांच्या बदली आदेशांची सर्व संबंधितांनी तात्काळ अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने खालील सुचनांचे कटाक्षाने पालन करावे.

अ) बदली झालेल्या अधिका-यास संबंधित कार्यालय प्रमुखांनी तात्काळ कार्यमुक्त करुन तसे संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना कळवावे. तसेच, बदली झालेल्या अधिका-यांनी त्यांची पदस्थापना केलेल्या कार्यालयात तात्काळ रुजू व्हावे.

ब) बदली झालेल्या अधिका-यास बदलीच्या ठिकाणी संबंधित कार्यालयात आल्यानंतर विनाविलंब हजर करुन घ्यावे, अन्यथा संबंधित कार्यालय प्रमुखास जबाबदार धरण्यात येईल.

क) बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही अधिका-याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणल्यास संबंधित अधिकारी शिस्तभंगविषयक कार्यवाहीस पात्र ठरतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७३११७४२४४६१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kanade Pramod G

Digitally signed by Kanade Pramod G
DN: CN = Kanade Pramod G, C = IN, S = Maharashtra, O = Govt. of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2014.07.31 17:52:33 +05'30'

**( प्र.गि.कानडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
२. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा ( सर्व)
३. संबंधित अधिकारी (संचालकांमार्फत)
४. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक/पुणे.
५. मा. मंत्री (पा.पु.व स्व.वि.) यांचे स्वीय सहाय्यक.
६. मा. राज्यमंत्री (पा.पु.व स्व.वि.) यांचे स्वीय सहाय्यक
७. निवडनस्ती (पापु-१५)